**नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. जिल्हा- बुलढाणा**
**(सन- २०१८-१९)**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१८/ प्र.क्र.१०२/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १५ फेब्रुवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अन्नधान्याच्या साठवणूकीसाठी बुलढाणा जिल्हयातील मोताळा, सिंदखेड राजा, मेहकर व (पोखरी) बुलढाणा येथील गोदाम बांधकामांचे प्रस्ताव जिल्हाधिकारी, बुलढाणा यांचेकडून प्राप्त झाले असून सदर गोदामांच्या अंदाजपत्रकांस व बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. सबब, शासकीय गोदाम बांधणीच्या अंदाजपत्रकास व कामास नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत हाती घेण्यात आलेल्या प्रकल्पातंर्गत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. बुलढाणा जिल्हयातील मोताळा ता.मोताळा, सिंदखेड राजा ता.सिंदखेड राजा (प्रत्येकी १०८० मे.टन), मेहकर ता.मेहकर व पोखरी ता.बुलढाणा (प्रत्येकी १८०० मे.टन) येथील गोदाम बांधकामांच्या अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. मेहकर, सिंदखेड राजा व (पोखरी) बुलढाणा हे अंदाजपत्रक (सन २०१६-१७) च्या दरसुचीवर व मोताळा हे अंदाजपत्रक (सन २०१७-१८) च्या दरसुचीवर आधारीत सविस्तर अंदाजपत्रक संबंधित उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलढाणा, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला तसेच उपभोक्ता विभागाच्या वतीने जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलढाणा यांनी साक्षांकित केले आहे.

II. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

III. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

IV. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात

३. **<u>शासकीय गोदाम बांधकाम:-</u>**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | प्रस्तावित गोदामाचे ठिकाण | गोदाम संख्या | प्रस्तावित गोदामाची क्षमता (मे.टन.) | सार्वजनिक बांधकाम विभाग मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजित खर्च (रू.) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | बुलढाणा | मेहकर | मेहकर | १ | १८०० | १,९८,१९,०००/- |
| २. | | मोताळा | मोताळा | १ | १०८० | १,१९,५०,४०५/- |
| ३. | | सिंदखेड राजा | सिंदखेड राजा | १ | १०८० | १,५५,९०,०००/- |
| ४. | | बुलढाणा | पोखरी | १ | १८०० | २,४७,७७,०००/- |
| **एकूण** | | | | **४** | **५७६०** | **७,२१,३६,४०५-/** |
| **(अक्षरी रुपये:- सात कोटी ऐकवीस लाख छत्तीस हजार चारशे पाच फक्त)** | | | | | | |

४. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या नवीन शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी प्राप्त झाल्यांनतर शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन विहित मुदतीत पूर्ण करण्यात यावीत.

५. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलढाणा यांनी घ्यावी.

६. सदर गोदाम बांधकामावरील खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

७. उपरोक्त खर्च “मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष “४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्यक्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल) (योजनेंतर्गत) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे “या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

८. बांधकामासाठी विलंब अथवा इतर कारणाने वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर गोदामांचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे. सदर गोदाम बांधकामांच्या कामांना आवश्यकतेनुसार निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

९. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

१०. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यांनंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरिक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

११. काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घेण्यात यावी.

१२. गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य गोदाम बांधकामाव्यतिरिक्त इतर सोयी सुविधांच्या समावेशाबाबत शासन स्तरावरुन दिलेल्या विविध सुचना विचारात घेवून जिल्हाधिकारी यांच्या स्तरावर खातरजमा करुन वजन काटे कार्यालये, प्रसाधन गृहे, इ. सोयींचा आवश्यकतेनुसार अंतर्भाव करावा.

१३. क्षेत्रीय स्तरावरुन प्राप्त अंदाजपत्रकाच्या छाननीअंती सार्वजनिक बांधकाम विभागाने Recapitulation Sheet मध्ये सुधारणा केल्या आहेत. सदर Recapitulation Sheet व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीसंबधी टिपणीच्या प्रती जिल्हाधिकारी व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांना निर्गमित करावयाच्या प्रतीसोबत जोडली आहे.

१४. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. सदर प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनौपचारीक संदर्भ क्रमांक-५०७/इमा-२, दि.२४.१२.२०१८ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीनुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१५१६०५२३३५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2019.02.15 16:10:09 +05'30'

**( प्र.गि.चव्हाण )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, अमरावती.
३. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा) , अमरावती.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलढाणा.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, बुलढाणा.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय,मुंबई
१३. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५
१४. निवड नस्ती/नापु-१६-ब.